भाषा संचालनालयातील अर्थसंकल्पाच्या मराठी अनुवादाचे काम करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांना मिळणाऱ्या मानधनाच्या दरात सुधारणा

**महाराष्ट्र शासन**

मराठी भाषा विभाग

शासन निर्णय क्रमांकः भासंमा-२०१५/प.क्र.१२१/आस्था-२,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १० सप्टेंबर,२०१८

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एलएनजी-१०७४/१०४४/२०, दि.१६.२.१९७६

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एलएनजी-१०९५/९५१/प्र.क्र.१६२/९५/५, दि.२१.३.१९९४.

**शासन निर्णय:-**

विधान मंडळास सादर करण्यात येणारी अर्थसंकल्प विषयक मराठी प्रकाशने तयार करण्याचे काम भाषा संचालनालयात ऑक्टोबर ते मार्च अशा ६ महिन्यांमध्ये केले जाते. या कामाचे महत्व व जबाबदारी तसेच विहित कालमर्यादेत ते पूर्ण करण्याचे बंधन या सर्व गोष्टी विचारात घेऊन संबंधित अधिकारी व कर्मचारी दररोज कार्यालयीन वेळेपेक्षा बरेच उशिरा थांबवून तसेच सुट्टीच्या दिवशीही काम करावे लागते. त्यामुळे करावा लागणारा अवांतर खर्च व तद्नुषंगिक अन्य बाबी लक्षात घेऊन हे काम करणाऱ्या सहायक संचालक, पर्यवेक्षक व अनुवादक यांना वर उल्लेख केलेल्या दि.२१.३.१९९४ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दरांनी मानधन दिले जाते. सदर मानधनाच्या दरांमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन आता असे आदेश देत आहे की, भाषा संचालनालयातील अर्थसंकल्पाचा मराठी अनुवादाचे काम करणाऱ्या भाषा उपसंचालक, सहायक भाषा संचालक, पर्यवेक्षक व अनुवादक यांना खाली दर्शविलेल्या दराने मानधन देण्यात यावे. मानधनाचे सुधारित दर वित्तीय वर्ष २०१८-१९ पासून लागू करण्यात यावेत.

| अ.क्र. | पदनाम | मानधनाचे प्रत्येकी सुधारित दर |
|---|---|---|
| १. | भाषा उपसंचालक (१ अधिकारी) | रु.६०००/- |
| २. | सहायक भाषा संचालक (२ अधिकारी) | रु.६०००/- |
| ३. | पर्यवेक्षक (३ कर्मचारी) | रु.४०००/- |
| ४. | अनुवादक (१० कर्मचारी) | रु.३०००/- |

३. सहा सहिन्यांच्या कालावधीचा समावेश असलेल्या म्हणजेच ऑक्टोबर ते मार्च अखेरपर्यंतच्या कालावधीसाठी अर्थसंकल्पीय अधिवेशनाच्या शेवटी एकरकमी मानधन दिले जाईल. अर्थसंकल्प संबंधित काम

करणाऱ्या वर नमूद केलेल्या कर्मचारी वर्गापैकी कोणत्याही कर्मचाऱ्यांने तो रजेवर असल्यामुळे किंवा त्यांची बदली झाल्यामुळे उक्त मुदतीत एक आठवड्यापेक्षा जास्त अशा कोणत्याही कालावधीत काम केले नसेल तर त्याला देण्यात येणाऱ्या मानधनात त्याच्या रजेच्या प्रमाणानुसार घट करण्यात येईल. "संबंधित व्यक्तीने सतत व समाधानकारकरीत्या अतिरिक्त काम पार पाडले असून ज्या कालावधीकरिता त्याला मानधन मंजूर करण्यात आले आहे त्या कालावधीत त्याला भोजन किंवा चहासाठी कोणताही खर्च देण्यात आलेला नाही, भाषा संचालक यांच्याकडून अशा आशयाचे, प्रमाणपत्र देणे अनिवार्य राहील.

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेड एफ-१, लेखाशीर्ष "२०५२-सचिवालय-सर्वसाधारण सेवा,०९० सचिवालय, (००) (०२) भाषा संचालक (अनिवार्य)-१३ कार्यालयीन खर्च" याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७६/१८सेवा-६/व्यय, दि.२३.०८.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१८०९०६१५५२४०३७३३** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanda Maruti Raut

Digitally signed by Nanda Maruti Raut
Date: 2018.09.10 11:21:43 +05'30'

**(नंदा मा.राऊत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /(लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४. भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग/सेवा-६/व्यय-४.
६. कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, अर्थसंकल्प/भाषा-२/नोंदणी शाखा.
७. निवडनस्ती.